# तीन चोर आणि राजा



इराणची लोककथा

# तीन चोर आणि राजा

## इराणची लोककथा



मराठी : अश्विनी बर्वे



खूप पूर्वी इराण मध्ये एक राजा राहत होता, ज्याची लांब,छान मिश्या होत्या. राजाचे नाव अब्बास होते. त्याला खायला खूप आवडे. रोज तो रुचकर पक्वान्न खात असे. पण तो नेहमी एकटाच जेवण करत असे.





एका संध्याकाळी राजा केशरी भात आणि डाळिंबाच्या बरोबर मासे खाण्यासाठी बसला. पण जेव्हा त्याने मासे खाण्याचा प्रयत्न केला, तेव्हा मासे इकडेतिकडे उड्या मारू लागले. त्या रात्री राजा जेवू शकला नाही. म्हणून त्याने आपल्या विश्वासू वजीराला बोलावलं.

माश्यांना बघून वजीर म्हणाला, “महाराज, हा या गोष्टीचा संकेत आहे की, आपल्या राज्यात काही भुकेले लोक आहेत. त्यांना खायला दिल्यानंतरच आपण रात्री जेवू शकाल.”





मग राजा अब्बासने थोडं जेवण घेतलं.त्याने एका गरीब माणसाचा वेष घेतला आणि मग महालाच्या बाहेर पडला.

त्याने आपल्या पूर्ण राज्यात शोधलं .शेवटी त्याला तो तीन गरीब माणसांजवळ पोहचला. तेव्हा ती माणसं शेकोटी जवळ बसून गप्पा मारत होते.



एका माणसाचे ओठ लाल आणि गोल होते. दुसऱ्याचे डोळे सुंदर होते आणि तिसऱ्याचे नाक जबरदस्त होते.

राजाने तिन्ही भूकेल्यांबरोबर आपलं रात्रीचं जेवण वाटून घेतलं. जेवण झाल्यावर ते शेकोटीची ऊब घेत आराम करू लागले. त्या तीन लोकांनी राजाला आपलं रहस्य सांगितलं.

“आम्ही आज रात्री राजाकडे चोरी करायला जात आहोत,” ते म्हणाले.

“हे काम अशक्य आहे!” राजा ओरडला.

“पण आम्ही आमच्या विशेष शक्तीने ते काम शक्य करू,” पहिला चोर आपल्या लाल गोल ओठांनी फुस्फुसेल. मी एक अशी एक शिट्टी वाजवू शकतो की प्रत्येकाला ती ऐकून झोप येईल.”

दुसऱ्या चोराने राजाकडे आपल्या सुंदर डोळ्यांनी पाहिले आणि म्हटले, “मी भिंतीच्या पलीकडच्या गोष्टी बघू शकतो.”

तिसऱ्या चोराने आपल्या जबरदस्त नाकाने हुंगलं आणि म्हणाला, “माझी शिंक एवढी जोरात असते त्यामुळे दरवाजे पार मुळासकट उखडून टाकू शकते.”

राज्याने पहिल्या चोराचे ओठ, दुसऱ्याचे डोळे आणि तिसऱ्याच्या नाकाकडे बघितले. मग त्याने आपल्या मिशा पिळल्या आणि म्हटले, “माझ्याजवळ पण एक शक्ती आहे. जर तुम्ही लोक पकडले गेले तर मी माझ्या मिशा पिळून तुम्हांला सोडवू शकतो.” राजाच्या मिशा एकदम भारी वाटत होत्या, म्हणून चोरांनी त्याला आपल्या गटात सामील केलं.



मग राजा आणि तीन चोर, अर्ध्या रात्री महालात चोरी करायला गेले.

जेव्हा ते महालाजवळ पोहचले तेव्हा पहिला चोर गेट जवळ गेला. त्याने आपल्या गोल ओठांनी एक लयदार शिट्टी वाजवली. त्यामुळे हवा स्थिर होवून एकदम जड झाली. मग लगेच सगळे पहारेकरी गाढ झोपले आणि हळूहळू जमिनीवर पडले. मग पहिल्या चोराने आपल्या साथीदारांना हात हलवून बोलावले. जेव्हा राजाने आपल्या पहारेकऱ्यांना झोपलेलं पाहिलं तेव्हा त्याचा विश्वास बसला नाही.





दुसऱ्या चोराने प्रत्येक दिशेला पाहिलं. मग तों आपल्या साथीदारांना भूलभुलैयातून राजाच्या खजिन्याच्या दरवाजाकडे घेवून गेला. राजा आश्चर्यचकित झाला. चोरांनी खरंच त्याचा खजिना शोधून काढला.



तिसऱ्या चोराने बाकीच्यांना आपल्या मागे उभं राहिला सांगितलं. मग त्याचे नाक कपू लागले आणि त्याने जोरात शिंक दिली. आ....च्छी ....! त्याच्या शक्तिशाली शिंकेने खजिन्याचा दरवाजा तुटला. हे बघून राजा एकदम दंग झाला.

आता त्यांच्या समोर शानदार खजिना होता. ज्यात बेसुमार दौलत भरलेली होती. चोर आनंदाने नाचू लागले आणि त्यांनी आपल्या पोतडीत चमकदार रत्ने आणि सोनं भरलं. मग ते आपली लुट घेवून महालाच्या मागच्या बाजूला पळू लागले. घाबरलेला राजा सुद्धा त्यांच्या मागेमागे पळाला. भागा.





शेकोटीजवळ येवून चोरांनी राजाला सुद्धा खजिन्यातला वाटा दिला.

राजाने तिन्ही चोरांच्या झोपण्याची वाट बघितली. त्यानंतर तो आपल्या महालात परत आला.









राजाने आपले शाही वस्त्र घातले आणि मग झोपलेल्या पहारेकऱ्यांना जागं केलं आणि त्यांना चोरांना अटक करण्याचा आदेश दिला. लवकरच राजाच्या पहारेकऱ्यानी चोरांना दरबारात ओढत घेवून आले.

राजाने आपल्या वजिराला बोलावले.

वजिराने तिन्ही चोरांकडे नीट बघितले. “महाराज हा फक्त एक संकेत आहे.आपण आपल्या शक्तीचा उपयोग चांगल्या किंवा वाईट कामासाठी करू शकतो.”

राजाने वजीराकडे रागाने पाहिलं. “बघा. हे तीन चोर आहेत,” राजा आपल्या सिंहासनावर जावून बसला.



इराणच्या महान राजाने आपल्या सिंहासनावरून त्या घाबरलेल्या चोरांकडे बघितले. “तुम्ही लोकांनी अशा विचार कसा केला की तुम्ही लोक राजाचा खजिना लुटू शकतात,” राजा ओरडून म्हणाला. तिन्ही चोरांनी आपण निरपराध आहोत असं म्हटलं.

त्यानंतर राजा अब्बासने आपले शाही वस्त्र उतरवले. त्याच्या आत खराब कपडे होते जे त्याने चोरांना भेटण्याच्या वेळी घातले होते. ते बघून न्यायालयात भूकंप झाला. चोरांनी क्षमा मागितली.

मग राजाने आपल्या पहारेकऱ्यांना बोलावलं.

"या तिघांना काळकोठडीत बंद करा." पहारेकऱ्यांनी चोरांना घेरलं.पहिल्या चोराने दुसऱ्या चोराला ढोपर मारलं, दुसऱ्याने तिसऱ्याला ढोपर मारलं. मग तिसऱ्या चोराने हिम्मत गोळा करून राजाला म्हटलं, "महाराज काल रात्री आपण म्हटलं होतं की, जर आम्ही पकडलो गेलो तर तुम्ही तुमच्या मिशा पिळून आम्हांला सोडवाल. आता लवकर तुमच्या मिशा पिळा."

मग राजाने इशारा केला. पहारेकरी थांबले. न्यायालय गप्प झाले.





राजाने विचार केला. त्याने पहिल्या चोराचे ओठ,दुसऱ्याचे डोळे, तिसऱ्या चोराचे नाक बघितलं. मग राजाने थोड्यावेळ विचार केला. आणि मग त्याला आठवलं. वजीर म्हणाला होता, “शक्तीचा उपयोग चांगल्या किंवा वाईट या दोन्ही कामासाठी केला जाऊ शकतो.” हळूहळू राजाच्या चेहऱ्यावर हसू आले आणि मग त्याने आपल्या मिशा पिळायला सुरुवात केली. शेवटी राजाने घोषणा केली, "एक राजा कधीच आपला दिलेला शब्द मोडत नाही. आजपासून तुम्ही तिघे माझ्या महालात राहाल. बरोबर राहून आपण आपल्या शक्तिचा उपयोग करून हे बघू की आपल्या राज्यात कोणी कधीच भुकेले राहणार नाही.”





हे ऐकून तिन्ही चोर एवढे खुश झाले की पहिल्या चोराच्या गोल ओठांवर हसू आले, दुसऱ्या चोराचे डोळे आनंदाने चमकू लागले, आणि तिसऱ्या चोराचे नाक आनंदाने फुरफुरू लागले. न्यायालयाने आपल्या दयाळू आणि बुद्धिमान राजाचा जय-जयकार केला.मग वजिराने राजाकडे बघितलं आणि आपली मान हलवली.



त्या दिवसानंतर राजा कधीच एकटा जेवला नाही. राजाचे पहारेकरी, विश्वासू वजीर आणि तिन्ही चोर मिळून रोज राजा बरोबर जेवण करू लागले. जेव्हा ते केशरी भात, डाळींबा बरोबर मासे खात तेव्हा राजा हसत असे.



समाप्त